दि. २ ते ४ फेब्रुवारी, २०१९ दरम्यान जालना येथील आयोजित अखिल भारतीय पशु-पक्षी प्रदर्शनामध्ये सहभागी होणाऱ्या पशुधनास बक्षिस आणि पशुपालकास मानधन देणेसाठी, तसेच, जनावरांच्या वाहतुक व वाहतुक विमा इत्यादी अनुषंगीक बाबींच्या खर्चासाठी रू.२२६.४४ लक्ष रक्कम संक्षिप्त देयकावर एकरकमी काढण्यास शासनाची मान्यता प्रदान करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०१८/प्र.क्र.९४ (भाग-१)/पदुम-४
कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
मंत्रालय विस्तार, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई -४०० ०३२
दिनांक : ३१ जानेवारी, २०१९

वाचा :-

१. कृषि व पदुम विभाग,शासन निर्णय क्रमांक: राज्ययो-२०१२/प्र.क्र.३०१/ पदुम-४, दि.३१/१/२०१३
२. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०१८/प्र.क्र.९४/ भाग-१/पदुम-४, दि.१३/१२/२०१८
३. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०१८/प्र.क्र.९४/ भाग-१/पदुम-४, दि.२३/१/२०१९

प्रस्तावना :-

दि. २ ते ४ फेब्रुवारी, २०१९ या कालावधीत जालना येथे राष्ट्रीय स्तरावरील पशु-पक्षी प्रदर्शन अयोजित करण्यात येत आहे. सदर प्रदर्शनासाठी वाचा-३ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. सदर प्रदर्शनासाठी राज्यातील तसेच, राज्याबाहेरील जातीवंत पशु-पक्षांमधून सर्वोत्कृष्ठ पशुधनाची व पक्षांची निवड करुन पशुपालकांना सन्मानीत करणे, राज्यातून व परराज्यातून पशुधनाची वाहतूक करणे, जनावरांचा वाहतूक विमा (Transit Insurance ), बक्षिसे आणि सहभागासाठी मानधन / प्रोत्साहनपर रक्कम, पशुधनाकरिता हिरवा चारा व वाळलेला चारा, पशुखाद्य व या अनुषंगीक बाबींवरील खर्च भागविण्यासाठी रू.२२६.४४ लक्ष रक्कम संक्षिप्त देयकावर एकरकमी काढण्यास मान्यता प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्याअनुषंगाने खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

शासन निर्णय :-

दि. २ ते ४ फेब्रवारी, २०१९ या कालावधीत जालना येथे आयोजित आखिल भारतीय पशु-पक्षी प्रदर्शनासाठी सहभागी होणाऱ्या पशुधनास बक्षिस आणि पशुपालकास मानधन देणेसाठी, तसेच, जनावरांच्या वाहतुक व वाहतुक विमा इत्यादी अनुषंगीक बाबीसाठी सन २०१८-१९ करिता खालील लेखाशिर्षापुढे नमूद केलेल्या तरतुदीमधील रु.२२६.४४ लक्ष (अक्षरी रुपये दोन कोटी सव्वीस लाख चव्वेचाळीस हजार फक्त ) एवढया निधीचे विवरण खालील प्रमाणे.

| अ.क्र. | लेखाशिर्ष | खर्चाची बाब | निधी |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | मागणी क्र.डी-४<br>२४०३-पशुसंवर्धन<br>(०१)(०१) पशुसंवर्धन संचालनालय<br>(अनिवार्य खर्च )<br>१३- कार्यालयीन खर्च रु.४५० लक्ष<br>सांकेतांक २४०३००२४ | राज्यातुन परराज्यातुन पशुधनाची वाहतूक करणे | रु.८८.६७ लक्ष |
| | | जनावरांचा वाहतुक विमा (Transit Insurance) | रु.१५.०० लक्ष |
| | | बक्षिसे आणि सहभागासाठी मानधन/ प्रोत्साहन पर भत्ता | रु.११०.७७ लक्ष |
| | | पशुधनाकरिता हिरवा व वाळलेला चारा आणि पशुखाद्य | रु.१२.०० |
| | | **एकूण** | **रु.२२६.४४ लक्ष** |

महाराष्ट्र आकस्मिक खर्च अधिनियम, १९६५ चा परिशिष्ट-१, विवरणपत्र -२ मधील अ.क्र. ५४ नुसार, दि. २ ते ४ फेब्रुवारी, २०१९ दरम्यान जालना येथे आखिल भारतीय पशु-पक्षी प्रदर्शनासाठी संबधित असलेले अनुषंगीक खर्च संक्षिप्त देयकावर काढणे अनुज्ञेय असुन, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग दोन, अ.क्र. ११ अ, नियम क्र.३४, वित्त विभाग, शासन निर्णय दि.१७ एप्रिल, २०१५ अन्वये अधिदान व लेखा कार्यालय / कोषागार यामधुन संक्षिप्त देयकावर रक्कम काढण्याबाबत प्रशासकीय विभागास रू. ४.०० लक्ष मर्यादेपर्यंतचे अधिकार आहेत. परंतू या प्रकरणी सदर रक्कम त्यापेक्षा जास्त असल्याने, वित्त विभागाच्या सहमतीनुसार दि. २ ते ४ फेब्रुवारी, २०१९ दरम्यान आयोजित होणाऱ्या आखिल भारतीय पशु-पक्षी प्रदर्शन जालना, येथील प्रदर्शनातील उपरोक्त नमूद बाबींचा खर्च भागविण्यासाठी एकुण रु. २२६.४४ लक्ष (अक्षरी रुपये दोन कोटी सव्वीस लाख चव्वेचाळीस हजार फक्त ) रक्कम संक्षिप्त देयकावर काढण्यास खालील अटींच्या अधिन राहून शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१) शासन परिपत्रक क्र.मुंविनि-१०१६/प्र.क्र.३८/१७/विनिमय, दि.१८.१२.२०१७ मधील सूचनेनुसार (२४०३ ००२४) या लेखाशीर्षाखाली दि.३१.१२.२०१८ यापूर्वीची प्रलंबित तपशीलवार देयके प्रलंबित नाहीत.
२) दि.३१.१२.२०१८ नंतर संक्षिप्त देयकांवर काढलेल्या सर्व तपशीलवार देयकांचा तत्परतेने निपटारा करण्यात येईल.
३) या संक्षिप्त देयकाचे तपशीलवार देयक एक महिन्याच्या आत सादर करण्यात येईल.
४) खर्च नियमित देयकाद्वारे करणे शक्य नसून त्यासाठी संक्षिप्त देयकावर रक्कम काढणे अनिवार्य आहे.
५) या संक्षिप्त देयकाचे तपशीलवार देयक विहीत मुदतीत सादर करण्याची व्यक्तिगत जबाबदारी आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील.
६) मासिक निधी विवरणपत्रानुसार याकरिता निधी उपलब्ध आहे.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.८०/२०१९/व्यय-२ दि. २९.०१.२०१९ व विनियम शाखेचे अनैपचारिक संदर्भ क्र.५३/२०१९/विनियम दि.३०.०१.२०१९ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१३११५०८०४०४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्याआदेशानुसार व नावाने,**

Vikas Tulshiram Kadam

Digitally signed by Vikas Tulshiram Kadam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9869ec61c857e78e82b7a19b04c6d22f8ef1b8dbc9b19d45ef776d80ef148059, cn=Vikas Tulshiram Kadam
Date: 2019.01.31 15:19:29 +05'30'

**(विकास तु. कदम)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत**

१. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.
२. मा.मंत्री पदुम यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा.राज्यमंत्री पदुम, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई-३२
४. प्रधान सचिव, वित्त विभाग मंत्रालय मुंबई
५. सचिव, वित्त विभाग मंत्रालय मुंबई
६. आयुक्त, पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे-६७
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षा)-१/२, महाराष्ट्र मुंबई/नागपूर
८. संचालक लेखा व कोषागार, मुंबई
९. सर्व प्रादेशिक सहआयुक्त, पशुसंवर्धन
१०.जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त, सर्व
११.जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, सर्व
१२. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे
१३.जिल्हा कोषागार अधिकारी, सर्व
१४. निवडनस्ती पदुम-४